**ए.आ.वि.प्र., शहापूर अंतर्गत मृण्मयी विकास प्रबोधिनी संस्था, मुरबाड संचलित अनुदानित आश्रमशाळा तळवली (बा), ता. मुरबाड, जि. ठाणे ही शाळा किर्तीमान इंटिग्रेटेड डेव्हलपमेंट फाऊंडेशन, नाशिक या संस्थेकडे व्यवस्थापन हस्तांतरण करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अआशा-२०२३/प्र.क्र.७९/का-११**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ११ मे, २०२३

**वाचा:**

१) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. अआशा-१०९८/प्र.क्र.१/का.११, दि.१९.०३.१९९९
२) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. पोबेशा-२००६ /प्र.क्र.६६/का.११, दि.०६.०२.२००७
३) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. अआशा-२००८/प्र.क्र.१३२/का.११, दि.२१.०८.२००९
४) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. अआशा-२०१३/प्र.क्र.१८८/का-११, दि.२५.११.२०१३
५) अध्यक्ष, मृण्मयी विकास प्रबोधिनी संस्था, मुरबाड, जि. ठाणे यांचे जा.क्र. मृ.वि.स./ /२०२३, दि. ०६.०३.२०२३.
६) प्रकल्प अधिकारी, ए.आ.वि.प्र., शहापूर, जि. ठाणे यांचे पत्र जा.क्र. अनुआशा-२०२३/प्र.क्र./ का.३(४)/ २१६५, दि. २६.०३.२०२३.
७) अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे यांचे जा.क्र.अनुआशा-२०२३/प्र.क्र.५९ (२०२३)/का.७(२) / १५७७, दि.३१.०३.२०२३.
८) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे जा. क्र. अनुआशा-२०२३/प्र.क्र. /का.७ (४)/२५०७, दि. ०५.०४.२०२३.

**प्रस्तावना-**

ए.आ.वि.प्र., शहापूर अंतर्गत मृण्मयी विकास प्रबोधिनी संस्था, मुरबाड संचलित अनुदानित आश्रमशाळा तळवली (बा) ता. मुरबाड, जि. ठाणे ही शाळा किर्तीमान इंटिग्रेटेड डेव्हलपमेंट फाऊंडेशन, नाशिक या संस्थेकडे व्यवस्थापन हस्तांतरण करण्याचा संदर्भाधिन क्रमांक ८ येथे नमुद दिनांक ०५.०४.२०२३ रोजीच्या पत्रान्वये प्राप्त झालेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

ए.आ.वि.प्र., शहापूर अंतर्गत मृण्मयी विकास प्रबोधिनी संस्था, मुरबाड संचलित अनुदानित आश्रमशाळा तळवली (बा) ता. मुरबाड, जि. ठाणे ही शाळा किर्तीमान इंटिग्रेटेड डेव्हलपमेंट फाऊंडेशन, नाशिक या संस्थेकडे व्यवस्थापन हस्तांतर करण्यास खाली नमुद अटी व शर्तीवर मान्यता देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

(१) व्यवस्थापन बदल झालेल्या शाळेची किमान पटसंख्येची अट कोणत्याही कारणास्तव शिथिल केली जाणार नाही.

(२) व्यवस्थापन बदल झालेल्या शाळेच्या बाबतीत शासन परवानगीच्या / मान्यतेच्या कोणत्याही अटी व शर्तीमध्ये बदल होणार नाहीत याची खबरदारी घेण्यात यावी.

(३) शासनाकडून आश्रमशाळा, शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचारी, वेतन /वेतनेत्तर अनुदान, विद्यार्थी इ. बाबत वेळोवेळी विहित करण्यात येणारे अधिनियम, नियम, आदेश इ. चे पालन करणे नवीन संस्थेस बंधनकारक राहील.

(४) आश्रमशाळेशी संबंधित कार्यपद्धती व विभागाने किंवा विभागाच्या अधिकाऱ्यांनी वेळोवेळी निश्चित केलेल्या अशा प्रकारच्या सुचना यांची माहिती करुन घेणे ही व्यवस्थापनाची जबाबदारी राहील.

(५) आश्रमशाळा या मंजुरी व मान्यतेच्या शर्तीनुसार व विभागाने वेळोवेळी निर्धारित केलेल्या सूचनेनुसार चालविल्या जात आहे अशी व्यवस्थापनाने स्वत: खात्री करुन घेणे व त्यानुषंगाने आवश्यक पावले उचलणे हे व्यवस्थापनाचे कर्तव्य राहील. व्यवस्थापनाने त्यांच्या शाळेच्या कामकाजावर नियंत्रण ठेवणे व शाळेचा दर्जा उंचावण्यासाठी सतत प्रयत्नशील असणे आवश्यक आहे.

(६) सदर व्यवस्थापन बदल आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. अआशा-२०१३/ प्र.क्र.१८८/का.११, दि.२५.११.२०१३ मध्ये विहित केलेल्या नियमानुसार व कार्यपद्धतीनुसार अंमलात येईल.

(७) सदर व्यवस्थापन बदलासंदर्भात शासनाकडे अथवा आदिवासी विकास विभागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्याकडे नव्याने तक्रारी प्राप्त झाल्यास किंवा व्यवस्थापन बदला संदर्भातील अटी व शर्तीचा भंग झाल्याचे निदर्शनास आल्यास किंवा व्यवस्थापन बदलापूर्वीच्या संस्थेतील कार्यरत शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या सेवाशर्तींचा नवीन संस्थेद्वारा भंग झाल्यास, हस्तांतर रद्द करण्याचे अधिकार शासनास राहतील.

(८) नवीन संस्थेकडून आश्रमशाळा संहितेमध्ये विहित केलेल्या अटी व शर्तींचा भंग झाल्यास सदर आश्रमशाळेची मान्यता रद्द करण्याचे अधिकार अपर आयुक्तांच्या शिफारशीनंतर आयुक्तांना असतील. परंतु अशी मान्यता रद्द करण्यापुर्वी संबंधितांना आपले म्हणणे मांडण्याची संधी देण्यात येईल.

**२.** अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे यांनी सर्व बाबी तपासून शाळेचे व्यवस्थापन बदलाबाबत पुढील कार्यवाही ३० दिवसांत करावी व त्याबाबत शासनास अवगत करावे.

**३.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०५०९१७५५४२४४२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

UDAY GANPAT GAWAS

Digitally signed by UDAY GANPAT GAWAS
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=d99ad92d2ef92f97f483127c546b50d831cbc0858b00a86d17202dbe2e19d646, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9CE356F38C6A70A8FFDE299AD6627F48BD01E875A7ACA38BD139B0CC5367E62D, cn=UDAY GANPAT GAWAS
Date: 2023.05.18 15:14:28 +05'30'

**( उदय गवस )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत:**

१. मा. मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक.

३. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे.

४. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, शहापूर.

५. जिल्हा कोषागार अधिकारी, शहापूर.

६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.

७. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर.

८. अध्यक्ष/सचिव, मृण्मयी विकास प्रबोधिनी संस्था, मुरबाड, जि. ठाणे.

९. अध्यक्ष/सचिव, किर्तीमान इंटीग्रेटेड डेव्हलपमेंट फाऊंडेशन, नाशिक.